शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, जळगांव येथे उपचारार्थ दाखल होणा-या रुग्णांकरीता रुग्णालयीन आहार सेवा बाह्यस्त्रोतामार्फत उपलब्ध करुन घेण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वैशिवि-२०२३/प्र.क्र. १८९/प्रशा-२**
**गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार,**
**गो. ते. संकुल इमारत, ९ वा मजला, मंत्रालय, मुंबई.**
**तारीख: १७ जुलै, २०२३**

वाचा :-

१) वैद्यकीय शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०१४/प्र.क्र.१७८/प्रशासन-२, दिनांक ०६.०२.२०१५.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र. ८२/भाग-III/उद्योग-४, दि. ०१.१२.२०१६
४) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि- २०२२/प्र.क्र.१५/आ.पु.क., दिनांक २७.०४.२०२२.
५) अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, जळगांव यांचे पत्र क्र. शावैमवरुज/आहारसेवा/ई-निविदा/प्रशासकिय मान्यता/१४६१/२०२३, दिनांक ०२.०६.२०२३.
६) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन यांचे पत्र क्रमांकः DMER-२२०११/१६४/२०२३-PROC-१, दिनांक ०६.०७.२०२३.

प्रस्तावना :-

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय जळगांव या संस्थेमध्ये दैनंदिन रुग्ण आहार सेवा ( सकाळचा चहा+ नाश्ता, दुपारचे जेवण, सायंकाळचा चहा + नाश्ता, रात्रीचे जेवण) बाह्यस्त्रोतामार्फत उपलब्ध करुन घेण्याच्या अनुषंगाने निविदा प्रक्रिया राबविण्यात आली होती. सदर निविदा प्रक्रियेमधून न्युनत्तम दारानुसार पात्र ठरलेल्या सेवा पुरवठादाराशी करार करण्यास व त्यासाठी होणा-या वार्षिक खर्चास मान्यता देण्याचा प्रस्ताव संदर्भ क्र. ६ वरील दिनांक ०६.०७.२०२३ च्या पत्रान्वये संचालनालयाने शासनास सादर करण्यात आला आहे. सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय जळगांव या संस्थेमध्ये दैनंदिन रुग्ण आहार सेवा ( सकाळचा चहा + नाश्ता, दुपारचे जेवण, सायंकाळचा चहा + नाश्ता, रात्रीचे जेवण) बाह्यस्त्रोतामार्फत उपलब्ध करुन घेण्याच्या अनुषंगाने राबविण्यात आलेल्या निविदा प्रक्रियेमध्ये न्युनत्तम दरानुसार पात्र ठरलेल्या मे. साई इन्व्हेस्टीगेशन ॲन्ड सिक्युरिटी सर्व्हिसेस या सेवा पुरवठादारासोबत एक वर्षासाठी करार करण्यास व त्यासाठी येणाऱ्या वार्षिक रूपये ५४,९०,०००/- (अक्षरी रुपये चौपन्न लक्ष नव्वद हजार रुपये फक्त) इतक्या खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

२. रुग्णालयामधील आंतररुग्णांना नियमितपणे आहार उपलब्ध होईल तसेच सदर आहाराचा दर्जा योग्य राहील याची सर्वस्वी जबाबदारी संस्थेच्या अधिष्ठाता यांची राहील.

३. रुग्णांना पुरविण्यात येणा-या आहाराच्या दर्जाची नियमित तपासणी करणे आवश्यक आहे.

४. सदर कामासाठी येणारा खर्च शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय जळगांव या संस्थेच्या (२२१० जी ३४२) लेखाशिर्षाखाली (१९) आहार सेवा या उद्दिष्टांतर्गत त्या त्या वित्तीय वर्षाच्या मंजूर निधीतून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग शासन निर्णय दिनांक ०६.०२.२०१५ मधील अ.क्र. ४५ नियम क्र. १६९ नुसार प्रशासनिक विभागास असलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७१७१८३९४६०४१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHADEO JOGDAND

Digitally signed by MAHADEO JOGDAND
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0477d837dc0b00fc2cbd45d17d07c625c3417378f97d493a8a277faa29f65459, pseudonym=85719993A847361CF1CE96786397786A408A4972, serialNumber=C1D08CFDEE92DA209D709F5456D9EDE95236B8A8E7E2A2801B8FED03DCF793D3, cn=MAHADEO JOGDAND
Date: 2023.07.17 07:05:28 -07'00'

(म.गि.जोगदंड)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल१/२, (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
२. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
३. संचालक,वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.

४. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, जळगांव

५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.

६. जिल्हा कोषागार अधिकारी, जळगांव.

७. निवडनस्ती (प्रशा-२).